मागासवर्गीय अनुदानीत वसतीगृहास मान्यता व अनुदान योजना

यशोधरा मुलींचे वसतीगृह नांदेड येथून अहमदपूर, जिल्हा लातूर येथे स्थलांतरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.**
**शासन निर्णय क्रमांक:- बीसीएच-२०११/प्र.क्र.३०५/मावक-४**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.**
**दिनांक :-** १९ सप्टेंबर, २०११

**वाचा :-** १) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्र.बीसीएच-१०९७/प्र.क्र.१०७/मावक-४, दि.१६.०३.१९९८

२) शासन शुध्दीपत्र, सा.न्या. व वि.स.विभाग क्र.बीसीएच-२०००/प्र.क्र.२९७/ मावक-४, दि.०१.०८.२००८

३) संचालक, समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र.सकसं/शिक्षण/अनु व गृह/ स्थलांतर /प्र.क्र.७१/कार्या.५/२०११-१२/२२४, दि.१७.६.२०११

**प्रस्तावना :-**

स्वयंसेवी संस्थांमार्फत अनुसूचित जातींच्या मुला-मुलींकरीता चालविण्यात येणाऱ्या अनुदानीत वसतीगृहांना मान्यता व अनुदान या योजनेअंतर्गत कमला नेहरू ग्रामीण विकास मंडळ, हडोळती, ता.अहमदपूर, जिल्हा लातूर संचलित यशोधरा मुलींचे वसतीगृह नांदेड येथे कार्यरत आहे. परंतु संस्थेस तेथे वसतीगृह चालविण्यास अडचणी येत आहेत याकरिता संस्थेने अहमदपूर, जिल्हा लातूर येथे वसतीगृह स्थलांतर करण्यास मान्यता देण्याची विनंती शासनास केले आहे. त्यानुसार सदर वसतीगृह अहमदपूर, जिल्हा लातूर येथे स्थलांतर करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

याबाबत सखोल विचार करून कमला नेहरू ग्रामीण विकास मंडळ, हडोळती, ता.अहमदपूर, जिल्हा लातूर संचलित यशोधरा मुलींचे वसतीगृह नांदेड हे वसतीगृह अहमदपूर, जिल्हा लातूर येथे स्थलांतरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर आदेश सन २०११-१२ या शैक्षणिक वर्षापासून लागू रहातील. सन २०११-१२ या शैक्षणिक वर्षामध्ये सदर वसतीगृहातील प्रवेशीत विद्यार्थ्यांचे नजीकच्या इतर अनुदानीत वसतीगृहामध्ये समायोजन, समाजकल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद नांदेड याचेद्वारे करण्यात यावे.

३. सदर वसतीगृहातील मान्य कर्मचारी वर्गाची सेवा अबाधित राखण्याची जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.

४. सदर संस्थेला मागासवर्गीय अनुदानीत विद्यार्थी वसतीगृह मान्यता व अनुदान या योजनेचे अस्तित्वात असलेले सर्व नियम व वेळोवेळी अस्तित्वात येणाऱ्या नियमांचे पालन करणे बंधनकारक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०९२१११४८३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सही/-

**(शिवाजी चौरे)**

**कक्ष अधिकारी महाराष्ट्र शासन**

प्रति,

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
विभागीय समाज कल्याण अधिकारी, लातूर
मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, लातूर / नांदेड
विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी, लातूर / नांदेड
जिल्हा समाज कल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद, लातूर / नांदेड
जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर /नांदेड
कार्यासन अधिकारी अर्थसंकल्प, सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव / अध्यक्ष, संबंधित संस्था,
निवड नस्ती-मावक-४.